कोव्हीड -१९ या विषाणूच्या वाढत्या प्रादुर्भावामुळे निर्माण झालेल्या आपत्कालीन परिस्थितीत ससून सर्वोपचार रुग्णालय, पुणे येथील अधिपरिचारिका, परिसेविका व वर्ग-४ संवर्गातील पदांच्या सेवा बाह्य यंत्रणेद्वारे उपलब्ध करुन घेण्यास आणि त्यासाठी आवश्यक निधी मंजूर करण्यास मान्यता देणेबाबत.

## महाराष्ट्र शासन

वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय
शासन निर्णय क्रमांक : कोव्हीड- २०२०/प्र.क्र.६८/वैसेवा-४
गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार (७ वा मजला),
लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय, मुंबई ४०० ००१.
दिनांक : १८ जून,२०२०

**प्रस्तावना :-**

कोव्हीड-१९ या विषाणूच्या प्रादुर्भावामुळे निर्माण झालेल्या आपत्कालीन परिस्थितीत ससून सर्वोपचार रुग्णालय, पुणे येथील परिसेविकांची ११ पदे, अधिपरिचारिकांची १०४ पदे व वर्ग-४ संवर्गातील १११ पदे अशी एकूण २२६ पदांच्या सेवा बाह्यस्त्रोताद्वारे उपलब्ध करुन घेण्यास कार्योत्तर मान्यता देण्याबाबतचा मुद्दा शासनाच्या विचाराधीन होता. तसेच त्यासाठी आवश्यक रू ५,९६,००,०००/- इतका निधी स्वीय प्रपंजी खात्यामधून खर्ची करण्यास मान्यता देण्याबाबतचा मुद्दा शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :**

कोव्हीड-१९ या विषाणूच्या प्रादुर्भावामुळे निर्माण झालेल्या आपत्कालीन परिस्थितीत ससून सर्वोपचार रुग्णालय, पुणे येथील परिसेविका, अधिपरिचारिका व वर्ग-४ या संवर्गातील पदांच्या सेवा ८ महिन्यांकरीता (दिनांक ०१.०५.२०२० ते ३१.१२.२०२०) बाह्यस्त्रोताद्वारे उपलब्ध करुन घेण्यास खालील अटींच्या अधीन राहून कार्योत्तर मान्यता देण्यात येत आहे.

१. परिसेविकेची रिक्त ११ पदे बाह्यस्त्रोतामार्फत भरण्यात यावीत.

२. अधिपरिचारिकांची रिक्त ४३ पदे बाह्यस्त्रोतामार्फत भरण्यात यावीत.

३. अधिपरिचारिकांची ६१ पदे (१०४-४३=६१) व वर्ग -४ संवर्गातील १११ ही नवीन पदे ८ महिन्यांकरीता निर्माण करण्यास मंजूरी देण्यात येत आहे व सदर पदे बाह्ययंत्रणेमार्फत भरण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

४. तसेच सदर पदे बाह्ययंत्रणेमार्फत भरण्यासाठी येणारा खर्च रू.५,९६,००,०००/- हा ससून सर्वोपचार रुग्णालय, पुणे या संस्थेच्या स्वीय प्रपंजी खात्यामधून करण्यास

अनुमती देण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय वित्त विभागाकडील अनौपचारिक संदर्भ क्र. १७६/ आपुक दि.१५.०६.२०२० ला अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

३. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२००६१७१८४२०९४६१३ असा आहे.

४. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Dattatraya Ekanath Ghanavat

Digitally signed by Dattatraya Ekanath Ghanavat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Medical Education and Drugs Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e754dcfc3ad39b1f1ee734fb62ca6c0558ffcae55bba934d42bad451952ab66c, serialNumber=2f161bc485abcbf56c592541f63a01c891a0b9fc64a67387f5d785197f14e51e, cn=Dattatraya Ekanath Ghanavat
Date: 2020.06.18 12:56:09 +05'30'

(द.ए.घनवट)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१. मा.मंत्री (वै.शि.) यांचे कार्यालय,महाराष्ट्र राज्य,मुंबई
२. मा.राज्यमंत्री (वै.शि.) यांचे कार्यालय,महाराष्ट्र राज्य,मुंबई
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई-१/ नागपूर-२
४. सचिव (व्यय- १३), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
५. संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, महाराष्ट्र राज्य, मुंबई
६. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
७. सहसचिव /उपसचिव (परिचर्या /वैसेवा), वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
९. जिल्हा कोषागार अधिकारी, कोषागार कार्यालय, पुणे
१०. अधिष्ठाता,ससून सर्वोपचार रुग्णालय, पुणे
११. निवडनस्ती (परिचर्या)

*************************